शासकीय वैद्यकीय महाविदयालय नागपूर व इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय नागपूर आणि शासकीय आयुर्वेदिक महाविद्यालय नागपूर येथील इमारत बांधकामासाठी मागणी क्रमांक एच-०८, ४२१० ००४१ व ४२१० ००७९ अंतर्गत शिल्लक निधी ठेव अंशदान लेखाशीर्षाखाली वर्ग करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन निर्णय क्रमांक : निधीवि-२०२५/प्र.क्र.२००/ प्रशा-१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ९ वा मजला,

लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.

दिनांक : २९/०३/२०२५

**शासन निर्णय :**

शासकीय वैद्यकीय महाविदयालय नागपूर व इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय नागपूर आणि शासकीय आयुर्वेदिक महाविद्यालय नागपूर बांधकामासाठी मागणी क्रमांक एच-०८, ४२१० ००४१ व ४२१० ००७९ असे स्वतंत्र लेखाशिर्ष विहीत कार्यपध्दतीने निर्माण करण्यात आलेले आहे. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सदर लेखाशीर्षात विभागाने संबंधित संस्थांसाठी अर्थसंकल्पित केलेल्या रु. ३५०.३८ कोटी निधी वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर निधीपैकी रू.२५१.०२ कोटी नीधी खर्च झाला आहे. उर्वरीत रू.९९.३६ कोटी निधीपैकी दि.३१ मार्च, २०२५ रोजी शिल्लक रहाणारा निधी इतका निधी सन २०२५-२६ या वित्तीय वर्षात उपरोक्त बांधकामासाठी वापरण्यासाठी ८४४३- ठेव अंशदान या लेखाशीर्षाखाली वर्ग करण्यास सदर शासन निर्णयाद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. याविषयी मागणी क्रमांक एच-०८, ४२१० ००४१ व ४२१० ००७९ अंतर्गत उपलब्ध निधीपैकी दि.३१ मार्च, २०२५ रोजी शिल्लक रहाणारा निधी ८४४३- ठेव अंशदान लेखाशीर्षाखाली वर्ग करणेबाबतची कार्यवाही विहीत कार्यपध्दतीनुसार संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागाच्या विभागीय कार्यालयाने करावी.

३. विषयाकित बांधकामासाठी ८४४३- ठेव अंशदान या लेखाशीर्षाखाली वर्ग केलेला निधी सन २०२५-२६ मध्ये विहीत कार्यपध्दतीनुसार प्राथम्याने वापरणेबाबतची कार्यवाही संबंधित विभागीय कार्यालयाने करावी. तद्नंतरच उपरोक्त बांधकामासाठी संबंधित लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीची मागणी करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५७/२०२५/व्यय-१३, दिनांक २९/०३/२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३१११३७०२३६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b8240 6eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8 EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF111 1D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2025.03.31 15:04:01 +05'30'

**(सुधीर ज.शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१. महालेखाकार - १/२ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. अपर मुख्य सचिव , सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई,
४. सहसचिव (व्यय ), वित्त विभाग, मंत्रालय मुंबई,
५. उपसचिव,(आयु), वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई,
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर,
८. अधिक्षक अभियंता , सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर,
९. कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सार्वजनिक बांधकाम ) विभाग, नागपूर,
१०.अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविदयालय नागपूर/इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय नागपूर/शासकीय आयुर्वेदिक महाविद्यालय नागपूर,
११.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१२. निवडनस्ती (प्रशा-१).